**वित्तीय वर्ष २०२४-२५ करीता औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास (४८७५ ००२५) या योजनेअंतर्गत खर्चास मान्यता देण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्र.औपासू- २०२४/ प्र.क्र.२०३/ उद्योग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ मार्च,२०२५

**वाचा** :- १) शासन निर्णय क्र. आयआयआय पॉलिसी २०१०/ प्र.क्र.७६८/ उद्योग-२, दि.२२/०२/२०१३.
२) शासन निर्णय क्र.औपासू २०१२/ प्र.क्र.२३४/ उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४.
३) शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/ प्र.क्र.२१९/ उद्योग-२, दि.२०/१२/२०१६.
४) सुकाणू समितीच्या दि. २६/०३/२०२५ रोजी संपन्न अकराव्या बैठकीचे इतिवृत्त दि २७/०३/२०२५

**प्रस्तावना :-**

औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास योजना (४८७५ ००२५) याअंतर्गत उद्योग संचालनालयामार्फत प्राप्त प्रस्ताव मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि२६/०३/२०२५ रोजी संपन्न झालेल्या सुकाणू समितीच्या अकराव्या बैठकीमध्ये विचारार्थ ठेवण्यात आले होते. सदर बैठकीमध्ये समितीसमोर सादर करण्यात आलेल्या प्रस्तावांपैकी ज्या प्रकल्पांना निधी वितरीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, त्या प्रस्तावांची छाननी झाल्यानंतर उद्योग संचालनालयाने मंजूर प्रस्तावांच्या अनुषंगाने प्रशासकीय मंजूरीचे प्रस्ताव सत्वर शासनास सादर करावेत व तद्नंतर सुकाणू समितीने मान्यता दिलेल्या प्रकल्प मंजूरीच्या किंमतीनुसार उद्योग विभागाकडून प्रचलित कार्यपध्दतीनुसार प्रशासकीय मंजूरी आदेश/ कार्यान्वयन यंत्रणाकडून तांत्रिक मान्यता/ निधी वितरण आदेश विभागाकडून प्रस्तावित करण्यात येतील. सन २०२४-२५ या चालू आर्थिक वर्षात बिडीएस प्रणालीवर उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीमधून रुपये रु.२४,१४,७७,९५०/- एवढा निधी विकास आयुक्त (उद्योग) यांना वितरीत करुन, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे सुपूर्द करावा व विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन संबंधित कार्यान्वयन यंत्रणांना अदा करावा, असा निर्णय मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीने घेतला आहे. सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भ क्र.४ येथील दि.२७/०३/२०२५ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सुकाणू समितीने घेतलेल्या निर्णयानुसार सदर योजनेअंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रुपये रु.२४,१४,७७,९५०/- इतका निधी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या अधिनस्त ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीने दि.२६/.०३/२०२५ रोजीच्या अकराव्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास (४८७५ ००२५) या योजनेकरीता सन २०२४-२५ या चालू आर्थिक वर्षात बिडीएस प्रणालीवर उपलब्ध सुधारीत अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी रुपये रु.२४,१४,७७,९५०/- (अक्षरी रु.चोवीस कोटी चौदा लाख सत्याहत्तर हजार नऊशे पन्नास फक्त) एवढी रक्कम विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयाकडे सुपूर्द करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांनी सदर निधी आहरीत करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करावा.

३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर रकमेचा धनादेश “मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई” यांचे नावे काढून त्यांना अदा करण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र.के-१०, मुख्य लेखाशिर्ष – “४८७५, इतर उद्योगावरील भांडवली खर्च ”, उपलेखाशिर्ष ६०-इतर, ८०० इतर खर्च, ८०० (००) (०१), औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास (कार्यक्रम) (४८७५ ००२५) या योजनेखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीच्या दि२६/०३/२०२५ रोजी संपन्न झालेल्या सुकाणू समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०३२८१६४२४८८०१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.28 16:43:34 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) , मुंबई.

२) महालेखापाल, महाराष्ट्र -२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.

३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.

५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.

७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.

८) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.

९) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४ /व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.

१०) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१) , मंत्रालय, मुंबई.

११) अवर सचिव(प्रशासन-१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवडनस्ती (उद्योग-२)